



**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,मंत्रालय मुख्य इमारत ,पहिला मजला ,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२**
**दुरध्वनी क्र. ०२२-२२०४८२४७** Email ID :dokh.rfd@maharashtra.gov.in

---

**क्रमांक:-गौखनि-३६/०७१९/प्र.क्र.१०८/ख-१** **दिनांक :- १० ऑगस्ट,२०२३**

**विषय : गौण खनिज-कोल्हापूर**
सन २०१६-१७ करीता मौजे सातवे, ता. पन्हाळा, येथील वाळूगट क्रमांक १६८१,१६८२,१६८३ या वाळू गटाची जप्त करण्यात आलेली १/४ रक्कम परत मिळणेबाबत.
**श्रीमती. वैभवी मनिष गायकवाड**

**शासन ज्ञापन:**

मौजे सातवे, ता. पन्हाळा, येथील वाळूगट क्रमांक १६८१,१६८२,१६८३ हा वाळू गट एकूण १४१३ ब्रास परीमाणाकरीता श्रीमती वैभवी मनिष गायकवाड यांना रुपये ३३,०८,०५१/- एवढ्या सर्वोच्च किंमतीस मंजूर करण्यात आला होता. लिलावधारक यांनी लिलावाची रक्कम शासन जमा करुनही मा. राष्ट्रीय हरीत न्यायाधिकरण, नवी दिल्ली येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्रमांक: ३६३/२०१५ व ३६६/२०१५ ते ३६८/२०१५ मधील दिनांक २९/०४/२०१७ चे आदेशान्वये व शासन पत्र दिनांक २१/०४/२०१७ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त सूचनांनुसार सक्शन पंपाद्वारे सुरु असलेले वाळूचे उत्खनन दिनांक २२/०४/२०१७ पासून पूर्णत: बंद करण्यात आल्याने वाळू गटाचा ताबा लिलावधारक यांना देण्यात आला नाही.

**०२**. उक्त वाळू गटाचा ताबा न मिळाल्याने लिलावधारक यांनी लिलावाची रक्कम परत मिळण्याबाबत मागणी केली होती. लिलावधारक यांनी लिलावाच्या रक्कमा विहित वेळेत शासन जमा न केल्याने लिलावाच्या १/४ रक्कम जप्त करुन उर्वरित रक्कम रुपये २४,८१,०३८/- दिनांक २०/०४/२०२० च्या शासन ज्ञापनान्वये लिलावधारक यांना दिली आहे.

**०३**. प्रकरणी लिलावधारक यांनी जप्त केलेली १/४ रक्कम परत करण्याच्या अनुषंगाने मा. मंत्री (महसूल) यांचेकडे दाखल केलेल्या अपीलावर मा. मंत्री (महसूल) यांनी दिनांक २७/०४/२०२३ रोजीच्या अर्धन्यायिक आदेशान्वये लिलावधारक यांची शासन जमा केलेली १/४ रक्कम रुपये ८,२७,०१३/- परत करण्याचे आदेश दिले आहेत. मा मंत्री (महसूल) यांचे सदर आदेश विचारात घेता मौजे सातवे, ता. पन्हाळा, येथील वाळूगट क्रमांक १६८१,१६८२,१६८३ या वाळू गटाची शासन जमा केलेली १/४ रक्कम रुपये ८,२७,०१३/- (रुपये आठ लाख सत्ताविस हजार तेरा मात्र) परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

**०४**. सबब, लिलावधारक श्रीमती वैभवी मनिष गायकवाड यांनी लिलावाची संपुर्ण रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापुर्वी या रक्कमेपैकी १/४ रक्कम लिलावधारक

यांना अदा केलेली नाही, याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर शासन ज्ञापन क्रमांक गौखनि-३६/०७१९/प्र.क्र.१०८/ख दिनांक २०/०४/२०२० अन्वये जप्त केलेली रक्कम रु. ८,२७,०१३/- (रुपये आठ लाख सत्ताविस हजार तेरा मात्र) इतकी अदा करण्यास या शासन ज्ञापनाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०५.** या बाबीवर होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग" १०२-खनिजाबाबत सवलत फी व स्वामित्वधन,९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) या लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेल्या अंदाजपत्रकीय तरतुदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

**०६.** सदर शासन ज्ञापन, वित्त विभागाच्या क्र.विअप्र-२०१९/प्र.क्र.२०/२०१९/विनियम, दि.०८/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८, भाग-२ नुसार महसूल व वन विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०८२२१५०९१७८९१९ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SHIVAJI SONAJI CHOURE

Digitally signed by SHIVAJI SONAJI CHOURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa37c7e079f23b78a27c84b9d6e46f94d549fc79ba170d5815f3619617b13313, pseudonym=0592554E096862442D21372FBE05C91C3D50FA17, serialNumber=03FE2B2D715BED4B0D90A99525AE06946672E68EA905C97DA50B34FD21223011, cn=SHIVAJI SONAJI CHOURE
Date: 2023.08.22 15:12:32 +05'30'

**( शिवाजी चौरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**
**जिल्हाधिकारी, कोल्हापूर**

प्रत:-

१) विभागीय आयुक्त, पुणे.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०००२०
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, प्रतिष्ठा भवन, १०१, महर्षि कर्वे भवन, न्यू मरीन लाईन्स, मुंबई-४०० ०२०.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
५) वित्त विभाग (व्यय-९/अर्थसंकल्प-३/६/१४ कार्यासने) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) कार्यासन अधिकारी (कार्यासन ब-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) निवडनस्ती (कार्यासन "ख-१"), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.